राज्यातील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील विनाअनुदानित / कायम विनाअनुदानित व्यावसायिक पदविका अभ्यासक्रमांचे शुल्क निर्धारण शुल्क नियामक प्राधिकरणाने करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. ईबीसी-२०१८/प्र.क्र.३२६/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३० ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन परिपत्रक क्र. १९ मे,२०१८
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२५२/तांशि-४, दिनांक ५ जुलै,२०१८
३) शासन अधिसूचना, क्र.संकीर्ण-२०१५-प्र.क्र.२५२-तांशि-४, दिनांक ५ जुलै,२०१८

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र विनाअनुदानित व्यावसायिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनिमयन) अधिनियम २०१५ (२०१५ चा महा.२८) दि.१७ ऑगस्ट, २०१५ पासून लागू करण्यात आलेला आहे. या अधिनियमातील कलम २ (द) अन्वये "व्यावसायिक शिक्षण" याचा अर्थ, शासनाने वेळोवेळी व्यावसायिक शिक्षण म्हणून घोषित व अधिसूचित केलेला कोणताही शैक्षणिक पाठ्यक्रम, असा असून त्यामध्ये, कोणत्याही नावाने संबोधला जाणारा व समुचित प्राधिकरणाने मान्यता दिलेला, पदवीपूर्व किंवा पदव्युत्तर पदवी, पदविका देणारा पाठ्यक्रम यांचा समावेश होतो; असे प्रयोजन करण्यात आलेले आहे. सदर अधिनियमातील तरतूदीव्दारे घोषित व्यावसायिक अभ्यासक्रमांचे प्रवेश, प्रवेश नियामक प्राधिकरण अंतर्गत असलेल्या राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष यांचेव्दारे करण्यात येतात. या अधिनियमातील कलम २ (द) मधील तरतूदीनुसार दि.१९मे, २०१८च्या शासन अधिसूचनेन्वये उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील विविध अभ्यासक्रम व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित केले होते. या अधिसूचनेसोबतच्या अनुसूची क (Schedule A)मध्ये व्यावसायिक पदविका पाठ्यक्रमांपैकी अनुक्रमांक १ येथील - अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका, अनुक्रमांक २ येथील - औषधनिर्माणशास्त्र पदविका व अनुक्रमांक ३ येथील - हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान पदविका अभ्यासक्रमांचा समावेश करण्यात आला होता. जात वैधता प्रमाणपत्र मिळण्यासंबंधीचे अडचणी व मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित विचारात घेऊन महाराष्ट्र विना अनुदानित व्यावसायिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम २०१५ च्या कलम २ (द) सह कलम ३ (१) व (२) नुसार दि.१९ मे, २०१८ रोजी अधिसूचित करण्यात आलेल्या अधिसूचनेसोबतच्या अनुसूची क (Schedule A) मधील व्यावसायिक पदविका पाठ्यक्रमांपैकी अनुक्रमांक १ येथील - अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका अनुक्रमांक २ येथील - औषधनिर्माणशास्त्र पदविका व अनुक्रमांक ३ येथील - हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान

पदविका हे तीन व्यावसायिक अभ्यासक्रम दि.०५ जुलै, २०१८ च्या अधिसूचनेव्दारे वगळण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. राज्यामध्ये सध्या ६५१ इतक्या विना अनुदानित पदविका संस्था आहेत. यापूर्वी या संस्था व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या संस्था म्हणून घोषित केल्या असल्यामुळे आतापर्यंत या पदविका अभ्यासक्रमांचे शुल्क निर्धारण या अधिनियमाखाली गठीत करण्यात आलेल्या शुल्क नियामक प्राधिकरणाकडून करण्यात येत होते. मात्र आता दिनांक ५ जुलै,२०१८ च्या अधिसूचनेमुळे हे पदविका अभ्यासक्रम व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून बिगर अधिसूचित झाले असल्यामुळे शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासूनचे विना अनुदानित पदविका अभ्यासक्रमाचे शुल्क निर्धारण शुल्क नियामक प्राधिकरणास करता येणार नाही. मात्र या संस्थांनी अवाजवी शुल्क आकारु नये व त्याचा विद्यार्थ्यांना नाहक आर्थिक भूर्दंड पडू नये याकरीता या पदविका संस्थांचे शुल्क निर्धारण करण्यासाठी व्यवसाय निर्माण करणे गरजेचे होते.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र विनाअनुदानित व्यावसायिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम २०१५ च्या कलम २२ मधील तरतूदीव्दारे राज्य शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करुन शासन असे निदेश देत आहे की, "राज्यातील तंत्र शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील ज्या विना अनुदानित व कायम विना अनुदानित अभियांत्रिकी व तंत्रज्ञान पदविका, औषधनिर्माणशास्त्र पदविका व हॉटेल व्यवस्थापन व खाद्यपेय व्यवस्था तंत्रज्ञान पदविका अभ्यासक्रमांचे शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पर्यंतचे शुल्क निर्धारण, शुल्क नियामक प्राधिकरणाने केले आहे अशा संस्थांनी शैक्षणिक वर्ष २०१९-२०२० वा त्यापुढील कालावधीकरीता अधिक शुल्काची मागणी केल्यास केवळ अशा संस्थांचे शुल्क निर्धारण, शुल्क नियामक प्राधिकरणाने करावे".

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१८१०३०१२०७१२५८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.10.30 15:45:57 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मंत्रालयीन प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव

४. सर्व सन्मानीय विधानपरिषद व विधानसभा सदस्य
५. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
७. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, न्यू एक्सेलसिअर बिल्डींग, फोर्ट, मुंबई-४००००१
८. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, न्यू एक्सेलसिअर बिल्डींग, फोर्ट, मुंबई-४००००१
९. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, ३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, ४९, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
१०. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. संचालक, पशु संवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परीक्षा मंडळ, शासकीय तंत्रनिकेतन इमारत,४९, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
१८. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व), (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
१९. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
२०. सर्व जिल्हाधिकारी
२१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
२२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर
२३. सर्व संबंधित मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
२४. उप सचिव (मशि/विशि/अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. अवर सचिव (तांशि-३, विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२६. कक्ष अधिकारी (मशि-२/मशि-४/तांशि-५/तांशि-६/साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
२८. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक
२९. निवडनस्ती/तांशि-४.